**मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांच्या अधिपत्या- खालील अनुसुचित जमातीचे जातीदावे अवैध ठरलेल्या अधिका-यांसाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२१/प्र.क्र.३८/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०१ मार्च, २०२३

**संदर्भ** :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०.
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि.०१ जून, २०२१.
४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांचे क्र.आस्था/का.३(६)/अधिसंख्य/ ७४३९/२०२२, दि.३० सप्टेंबर, २०२२ रोजीचे पत्र.
५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे क्र.कार्या.आस्था-२/ अधिसंख्य/३४६/२०२३, दि.१८ जानेवारी, २०२३.
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४ डिसेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांचे अनुसुचित जमातीचे जातीदावे अवैध ठरल्यामुळे त्यांच्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.०१ जून, २०२१ अन्वये अधिसंख्य पदे निर्माण करुन ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशींवर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदाची मुदत दि.३० सप्टेंबर, २०२२ रोजी संपुष्टात आल्यामुळे अधिसंख्य पदास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या खालील अधिकारी / कर्मचाऱ्यांचे अनुसुचित जमातीचे जातीदावे अवैध ठरल्यामुळे सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.०१ जून, २०२१ अन्वये त्यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४ डिसेंबर, २०२२ मधील अनु क्र.२ नुसार ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन ११ महिने (दि.०२ ऑक्टोबर, २०२२ पासून ते दि.०१ सप्टेंबर, २०२३ पर्यंत) किंवा त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकारी / कर्मचाऱ्याचे नांव | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.रामकृष्ण नारायण कुंभारे | शाखा अभियंता गट-ब | १४/०८/१९८४ | ३०/०६/२०२३ |
| २ | श्री.सुहास बाबुराव बोकडे | शाखा अभियंता गट-ब | १९/१२/१९९७ | ३०/०४/२०२८ |
| ३ | श्री.रविकांत पांडुरंगजी धकाते | शाखा अभियंता गट-ब | ०९/०६/१९९७ | ३१/०५/२०३० |
| ४ | श्री.भरतसिंह मगनसिंह परिहार | शाखा अभियंता गट-ब | २५/०५/१९९९ | ३१/०७/२०३२ |

२. वर नमूद कर्मचाऱ्यांच्या अधिसंख्य पदाच्या वेतनावर होणारा खर्च हा संबंधित अधिकारी/कर्मचारी ज्या कार्यालयात कार्यरत राहतील, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधीत वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१ डिसेंबर, २०१९, दि.३० जून, २०२० व दि.१४ डिसेंबर, २०२२ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३०११६४७१८६२१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKRAM NIVRUTTI DHAMAL

Digitally signed by VIKRAM NIVRUTTI DHAMAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=10D36944A4B86EAB516B1B70183709C5FB570CFDF5A52755ADFEF51ED380B836, cn=VIKRAM NIVRUTTI DHAMAL
Date: 2023.03.01 16:53:44 +05'30'

**( विक्रम नि. ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ , नागपूर.

**प्रत :-** १) अपर मुख्य सचिव (सा.बां.) /सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२) महालेखापाल (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
३) प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) कार्यासन सेवा-३/ सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती.